महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम संहिता (१९८४) मधील परिच्छेद क्र.१४२ प्रमाणे कामाचीअंदाजपत्रके तयार करतांना विचारात घ्यावयाच्या बाबी (वहन अंतर).

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्र. संकिर्ण-२०१०/(५७०/२०१०)/मोप्र-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २९/०७ /२०१७

वाचा:- १) शासन आदेश,जलसंपदा विभाग, क्र.संकिर्ण-२०१०/(५७०/२०१०)/मोप्र-२ दिनांक १७/०१/२०१५
२) शासन आदेश,जलसंपदा विभाग, क्र.संकिर्ण-२०१०/(५७०/२०१०)/मोप्र-२ दिनांक २९/१२/२०१६

**पूर्वपिठीका-**

१) संदर्भीय शासन आदेश क्र.१ व २ अन्वये जलसंपदा विभागाकडील कामांसाठी बांधकाम साहित्याचे वहन अंतर मंजूर करण्याचे अधिकाराबाबत निर्देश देण्यात आले आहेत. संदर्भ १ च्या शासन निर्णयात वहन अंतरास मान्यता देणा-या अधिका-याने खदानीपासूनची वहन अंतर तपासणी सक्षम स्तरावर झाली असल्याची तसेच खदानीमधील बांधकाम साहित्याची चाचणी घेऊन सदरील साहित्य बांधकामासाठी योग्य असल्याची गुणनियंत्रण विभागाचे प्रमाणपत्राची पूर्तता झाली आहे याची खात्री करूनच वहन अंतरास मान्यता दयावी असे नमूद केले आहे.

संदर्भ २ च्या आदेशान्वये ज्या कालव्याची वहनक्षमता १.०० क्युमेक्स पेक्षा कमी आहे, अशा कालवा / वितरीकांसाठी वहन अंतर मंजूर करण्यापूर्वी गुण नियंत्रण मंडळाची प्रमाणपत्र सक्तीचे असणार नाही. मात्र वहन अंतर मंजूर करणा-या अधिका-यांनी विनंती केल्यास गुणनियंत्रण विभागाने चाचण्या करून द्याव्यात. चाचण्या न करता वहन अंतर प्रमाणित केल्यास व भविष्यात प्रमाणित वहन अंतरात विहीत गुणधर्माचे साहित्य उपलब्ध नाही या कारणास्तव जादा वहन अंतराचे दावे ( Claims) उद्भवल्यास त्यास वहन अंतर मंजूर करणारे अधिकारी जबाबदार असतील, असे निर्देश देण्यात आले आहेत.

२) तथापि प्रकल्पाच्या धरणासारख्या मोठया स्वरुपाच्या कामाव्यतिरिक्त इतर लहान स्वरुपाच्या कामाजवळ शासकीय संपादीत खदानी, Notified खदानी नसतात. त्या असल्या तरी कामे पार पाडणारी अभिकरणे आवश्यक गुणवत्तेचे बांधकाम साहित्य त्यांच्या सोयीनुसार सोयीच्या ठिकाणाहून आणतात व कामे पार पाडतात. बांधकाम साहित्याची गुणवत्ता तसेच कामाची गुणवत्ता वेळोवेळी गुणनियंत्रण विभागामार्फत तपासली जाते, प्रकल्पाच्या धरणाच्या मोठया स्वरुपाच्या कामासाठीच फक्त संदर्भ क्र.२ मधील अटींचा अंतर्भाव ठेवून इतर कोणत्याही प्रकारच्या प्रकल्पांचे कामाकरीता गुणनियंत्रण विभागाच्या चाचण्या घेण्याची अट ठेवण्यात येवू नये, अशी विनंती मुख्य अभियंता ( जसं ), पुणे, यांनी त्यांचे दि. ०९/०२ /२०१७ रोजीच्या पत्रान्वये केली आहे.

३) सदर अभिप्रायांचा व त्यात विषद केलेल्या वस्तुनिष्ठ अडचणींचा विचार करून बांधकाम साहित्याचे वहन अंतर मंजूर करतांना खदानीतील साहित्याच्या गुणनियंत्रण विभागामार्फत करावयाच्या चाचण्या व प्राप्त करुन घ्यावयाच्या प्रमाणपत्राच्या अनुषंगाने संदर्भ क्र.२ अन्वये दिलेले आदेश अधिक्रमित करुन खालीलप्रमाणे सुधारित निर्देश देण्यात येत आहेत.

**शासन आदेश** -

१) प्रकल्पातील धरण व मुख्य कालवा या घटकांच्या कामांच्या अंदाजपत्रकासाठी वहन अंतर मंजुर करण्यापूर्वी संबंधित गुण नियंत्रण विभागाचे प्रमाणपत्र प्राप्त करून घेणे आवश्यक राहील. वितरण व्यवस्थेच्या, व्यवस्थापनाच्या व दुरुस्तीच्या कामाचे अंदाजपत्रकासाठी वहन अंतर मंजूर करण्यापूर्वी गुणनियंत्रण विभागाच्या प्रमाणपत्राची आवश्यकता नाही. मात्र वहन अंतर मंजूर करणाऱ्या अधिकाऱ्याने विनंती केल्यास गुण नियंत्रण विभागाने चाचण्या घेऊन निष्कर्ष उपलब्ध करावेत.

२) धरण व मुख्य कालवा या घटक कामांच्या अंदाजपत्रकासाठी बांधकाम साहित्याच्या गुण नियंत्रण विषयक चाचण्या न घेता वहन अंतर प्रमाणित केल्यास व भविष्यात प्रमाणित केलेल्या वहन अंतरात विहित गुणधर्माचे साहित्य उपलब्ध न झाल्याच्या कारणास्तव जादा वहन अंतराचे दावे (claims) उद्भवल्यास त्यास वहन अंतर प्रमाणित करणारे व मंजूर करणारे अभियंते जबाबदार राहतील.

वरील आदेश प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापासून अमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२९१६०१४२४५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Tulshiram Kedare

Digitally signed by Pandurang Tulshiram Kedare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e594e26c6ca4bffd8b1d4e20a155e473c21b0dd40f25c25bd478079005896501, cn=Pandurang Tulshiram Kedare
Date: 2017.07.29 16:06:41 +05'30'

**(पां.तु.केदारे)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२) मा.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) मा.प्रधान सचिव, (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
५) सचिव, (लाक्षेवि), मंत्रालय, मुंबई.
६) सर्व कार्यकारी संचालक,जलसंपदा विभाग.
७) सर्व महासंचालक,जलसंपदा विभाग.
८) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
९) सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१०) आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,
११) सर्व तांत्रिक अधिकारी , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.